१४ व्या वित्त आयोगांतर्गत राज्यात तात्पुरत्या स्वरुपात स्थापन करण्यात आलेल्या १६ अतिरिक्त न्यायालयांना व २३ जलदगती न्यायालयांना आणखी २ वर्ष मुदतवाढ देण्यास व त्याकरिता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- जगन्या-१४२२/प्र.क्र.१३७/का-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २२ एप्रिल, २०२५.

**वाचा :-** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. विशेन्या-१३१६/प्र.क्र.२०४/का.-९, दि.१८.०८.२०१७.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. विशेन्या-१३१६/प्र.क्र.२०५/का.-९, दि.१८.०८.२०१७.
३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. जगन्या-१४२२/प्र.क्र.१३७/का.-९, दि.०३.०७.२०२३.
४) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.A(Spl.)/FTC/2025/7/2025, दि.१५.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, दि.१८.०८.२०१७ अन्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत २४ जलदगती न्यायालये १८ अतिरिक्त न्यायालये सुरू होतील त्या दिनांकापासून ५ वर्षाकरिता स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली होती.

सदर प्रकरणी १८ अतिरिक्त न्यायालयांपैकी मुंबई व पुणे येथील प्रत्येकी १ याप्रमाणे २ अतिरिक्त न्यायालये अद्याप कार्यान्वित झालेली नाहीत. उर्वरित १६ अतिरिक्त न्यायालये व २४ जलदगती न्यायालये ही विविध दिनांकापासून सुरू झाली आहेत. या विभागाच्या दि.२६.०४.२०२३ रोजीच्या अधिसूचनेन्वये मंगळूरपीर, जिल्हा वाशीम येथील फिरते न्यायालय (जलदगती न्यायालय) नियमित करण्यात आले असल्यामुळे, सदर जलदगती न्यायालयास मुदतवाढ देण्याची आवश्यकता नसल्याचे उच्च न्यायालयाने दि. ११.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास

कळविले आहे. सबब, १४ व्या वित्त आयोगांतर्गत राज्यात ५ वर्षांच्या कालावधीकरीता स्थापन करण्यास मान्यता देण्यात आलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयांपैकी १६ अतिरिक्त न्यायालयांना व २४ जलदगती न्यायालयांपैकी २३ जलदगती न्यायालयांना त्यांचा ५ वर्षांचा कालावधी संपुष्टात आल्यामुळे, विधि व न्याय विभागाच्या दि. ०३.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये ही न्यायालये कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून त्यांचा ५ वर्षाचा कालावधी संपुष्टात आला/येत आहे त्या दिनांकापासून पुढे आणखी २ वर्षे मुदतवाढ देण्यात आली आहे.

राज्यातील दुय्यम न्यायालयातील प्रलंबित प्रकरणांची मोठी संख्या विचारात घेता, मूळ न्यायालयांवरील प्रलंबित प्रकरणांचा ताण कमी करणे व न्यायदानात गती आणण्याकरीता या न्यायालयांना आणखी दोन वर्ष मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालयाने दि. १५ जानेवारी, २०२५ रोजीच्या पत्राने शासनास सादर केला आहे. त्यानुसार १४ व्या वित्त आयोगांतर्गत राज्यात तात्पुरत्या स्वरुपात स्थापन करण्यात आलेल्या १६ अतिरिक्त न्यायालयांना व २३ जलदगती न्यायालयांना आणखी २ वर्ष मुदतवाढ देण्यास व त्याकरिता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विधि व न्याय विभागाच्या, दि. १८.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत राज्यात ५ वर्षांकरीता तात्पुरत्या स्वरुपात स्थापन करण्यात आलेल्या न्यायालयापैकी व दि.०३.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दोन वर्ष कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आलेल्या न्यायालयांचा कालावधी संपुष्टात येत असल्याने, **“परिशिष्ट-अ”** येथील २३ जलदगती न्यायालयांना व **“परिशिष्ट-ब”** येथील १६ अतिरिक्त न्यायालयांना त्या-त्या न्यायालयाची मुदत संपल्याच्या दिनांकानंतर लगतच्या दिनांकापासून आणखी दोन वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर न्यायालयांकरीता आवश्यक असणारी न्यायाधीश व त्यांच्या सहाय्यभूत कर्मचारी वर्गाची पदे पुढे सुरु ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच, यानुषंगाने जलदगती न्यायालयांकरीता येणारा व्दिवार्षिक खर्च अंदाजे रु.६१,२७,११,७५४/- व अतिरिक्त न्यायालयांकरीता येणारा व्दिवार्षिक खर्च अंदाजे रु.१७,१९,६६,१४४/- इतका याप्रमाणे एकूण रु.७८,४६,७७,८९८/- इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२.   सदर न्यायालयांतील अस्थायी पदांना, संबंधित न्यायालयांचा २ वर्षांचा कालावधी संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. त्यानंतर सदर अस्थायी पदांना शासनाच्या धोरणानुसार वेळोवेळी पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

३.   याकरिता, अतिरिक्त न्यायालयांकरीता येणारा खर्च येणारा "मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, १०५-दिवाणी व सत्र न्यायालये (०७) अतिरिक्त न्यायालये (०७)(०१) अतिरिक्त न्यायालये (अनिवार्य) (दत्तमत), संकेतांक क्र. (२०१४०५७५), या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच जलदगती न्यायालयांकरीता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, १०२-उच्च न्यायालये (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना (१३)(०१) जलदगती न्यायालये (अनिवार्य) (भारित), संकेतांक क्र. (२०१४०५९३) या लेखाशीर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४.   याकरीता आवश्यक निधी अर्थसंकल्पित करण्याची जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील.

५.   सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौ.सं.क्र. १०३/व्यय-५, दि.०७.०४.२०२५ अन्वये तसेच, मा. मंत्रिमंडळाच्या दि.२२.०४.२०२५ रोजीच्या बैठकीत झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०४२२१७२९४५४२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUVARNA KISHOR KEOLE

Digitally signed by SUVARNA KISHOR KEOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=39f5a2a28ae18f173fe4381f384d867b8fed154c08db77b7fcdca375f2503ecf, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=793E582AAA24EBF6D305198E8400CB6045397F1D19E6205DA83C5F5AC8FB64DB, cn=SUVARNA KISHOR KEOLE
Date: 2025.04.22 17:30:25 +05'30'

**( सुवर्णा किशोर केवले )**
**प्रधान सचिव व विधि परामर्शी**

**प्रतः**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री, वित्त व नियोजन यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री, नगर विकास यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
८. प्रबंधक (निरीक्षणे-१), उच्च न्यायालय, मुंबई.
९. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), उच्च न्यायालय, मुंबई.
१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, संबंधित जिल्हे,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे ,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. महालेखापाल - एक/दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१५. वित्त विभाग - कार्यासन व्यय-५/अर्थ-११,
१६. विधी व न्याय विभाग - कार्यासन-११,१२,२३,२४,२५,
१७. निवड नस्ती/का.९.

## “परिशिष्ट- अ” - जलदगती न्यायालये

| संवर्ग | जिल्हा | न्यायालयाचे ठिकाण |
|---|---|---|
| जिल्हा न्यायाधीश संवर्ग | अहमदनगर | संगमनेर |
| | | नेवासा |
| | अमरावती | अमरावती |
| | बीड | बीड |
| | बुलडाणा | खामगाव |
| | लातूर | लातूर |
| | परभणी | हिंगोली |
| | पुणे | खेड |
| | रत्नागिरी | खेड |
| | ठाणे | कल्याण |
| | | ठाणे |
| | मुंबई | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई |
| दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर आणि न्यायदंडाधिकारी संवर्ग | अहमदनगर | अहमदनगर |
| | बीड | माजलगाव |
| | भंडारा | भंडारा |
| | नांदेड | नांदेड |
| | | मुखेड (लिंक कोर्ट) |
| | उस्मानाबाद | परांडा |
| | | भूम |
| | रायगड-अलिबाग | पनवेल |
| | सातारा | कराड |
| | ठाणे | कल्याण |
| | यवतमाळ | पुसद |
| **एकूण जलदगती न्यायालये** | | **२३** |

## “परिशिष्ट -ब” - अतिरिक्त न्यायालये

| संवर्ग | जिल्हा | न्यायालयाचे ठिकाण |
|---|---|---|
| जिल्हा न्यायाधीश संवर्ग | अमरावती | अचलपूर |
| | औरंगाबाद | औरंगाबाद |
| | नागपूर | नागपूर |
| | | नागपूर (मोटर अपघात दावा प्राधिकरण/ MACT) |
| | नांदेड | नांदेड |
| | नाशिक | निफाड |
| | पालघर | वसई |
| | परभणी | परभणी |
| | रायगड-अलिबाग | माणगाव |
| | सातारा | कराड |
| | | वडुज |
| | सोलापूर | पंढरपूर |
| | | बार्शी |
| | ठाणे | ठाणे (मोटर अपघात दावा प्राधिकरण/ MACT) |
| दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर संवर्ग | नागपूर | नागपूर |
| | नाशिक | नाशिक |
| **एकूण अतिरिक्त न्यायालये** | | **१६** |